**वैयक्तिक पोलीस संरक्षण**
सुरक्षा रक्षकांनी घ्यावयाची दक्षता.

**महाराष्ट्र शासन,**
**गृह विभाग (विशेष).**

शासन परिपत्रक क्रमांक.एसएसए-०७००/सीआर-११०/विशा.४,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : 20 जुने, २००४.

वाचा : शासन परिपत्रक, गृह विभाग क्र. एसएसए-१०/२००१/१/विशा-४, दिनांक ३.१.२०००.

मुंबईसह राज्यात अनेक व्यक्तिंना असलेला धोका लक्षात घेऊन पोलीसांतर्फे सशुल्क / नि:शुल्क तत्वावर वेयक्तिक पोलीस संरक्षण पुरविण्यात येते. सदर सुरक्षा कर्मचा-यांची मुख्य जबाबदारी ही संरक्षीत व्यक्तिंच्या सुरक्षेची काळजी घेणे हे आहे. तथापि या सुरक्षा कामी पुरविण्यात आलेले पोलीस कर्मचारी हे संरक्षित व्यक्तिंची वैयक्तिक कामे करीत असल्याचे अनेकवेळा दिसून येते. यास्तव पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करावा :-

१) पोलीस सुरक्षा रक्षकांनी कोणत्याही स्वरुपाची संरक्षित व्यक्तिची व्यक्तिगत, घरगुती कामे, त्यांचे वाहन चालविणे, इत्यादी कामे करु नयेत.

२) पोलीस सुरक्षा रक्षक रखाद्या संरक्षित व्यक्तिचे व्यक्तिगत, घरगुती वा अन्य कामे करीत असल्याचे आढळल्यास त्याविरुध्द नियमानुसार शिस्तभंगाची कारवाई करण्यात यावी.

३) संरक्षित व्यक्ति आपली खाजगी, वैयक्तिक व घरगुती कामे पोलीस सुरक्षा रक्षकास करण्यास सांगत असल्यास त्या व्यक्तिची सुरक्षा कमी करण्यात यावी.

वरील मार्गदर्शक सूचना सर्व संबंधित पोलीस अधिका-यांना, पोलीस रक्षकांना व सर्व पोलीस ठाण्यांच्या निदर्शनास आणाव्यात व त्यांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(ज्ञ. सा. रणदिवे)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग (विशेष), महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
पोलीस आयुक्त, मुंबई.
आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस उपमहानिरीक्षक,
सर्व पोलीस अधीक्षक,
सर्व सहाय्यक पोलीस महानिरीक्षक.

प्रती माहितीसाठी :

मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
निवड नस्ती. विशा-४.